नवनाथ भक्तिसार    अध्याय तेहेतिसावा

श्रीगुरू दत्तात्रेयांचा निरोप घेऊन उभय नाथ तीर्थाटनासाठी निघाले. काशीनगरीत मात्र अघटीत घडले त्याची उत्कंठावर्धक कथा गत अध्यायात सादर झाली आहे. प्रजाहितदक्ष त्रिविक्रमसिंह राजाच्या मृत्युमुळे विलाप करणाऱ्या प्रजेला पाहून उभय नाथांनी त्याला मानवतेच्या दृष्टीकोनातून परम जिवंत करायचे ठरवले. पण राजाचा आत्मा ब्रम्हविलीन झाल्यामुळे मच्छिंद्रनाथांनी स्वतःचा आत्मा बारा वर्षांच्या कालावधीसाठी त्रिविक्रमच्या अचेतन कलेवरात समाविष्ट केला. आणि गोरक्षनाथांनी मच्छिंद्रनाथांचा अत्माविरहित अचेतन देह शिव मंदिरातल्या एका गुप्त गुहेत तेथील गुरवीणीच्या सहकार्याने दडवून ठेवला. पण त्याच गुरवीणीच्या एका शुल्लक चुकीमुळे हे रहस्य महाराणी रेवतीला शिव मंदिरातच कळले. राणीने बारा वर्षानंतरचा विचार करून योग्य ती तजवीज म्हणून गुरुमहाराज मच्छिंद्राच्या देहालाच नष्टप्राय केले. हे कुटील कारस्थान श्रीशिवांना पार्वतीकडून समजले. त्या अनुषंगाने श्रीशिवानंनी मच्छिंद्रांचा कलेवरचे राई राई एवढे कण परत गोळा करून आणावयास सांगितले व कैलासात विरभद्राकडे संरक्षणासाठी दिले. आता, त्यानंतरची कथा...

काशी नगरीच्या शिव मंदिरातून गुरु मच्छिंद्रनाथांचा अनुज्ञेने तीर्थाटनासाठी गेलेले गोराक्षंथ आता प्रतीच्या मार्गावर आहेत, कारण बारा वर्षांचा काळ संपण्यास अल्प अवधी उरला आहे. मच्छिंद्रनाथांच्या आत्म्याचे स्थित्यंतर प्रसंगी गोरक्षनाथांची उपस्थिती आवश्यक असणार आहे. लोक कल्याणास्तव अवतार धारण केलेल्या गोरक्षनाथ भूतलावरील अनेक तीर्थाक्षेत्रांचे दर्शन घेत, भ्रमंती करीत गोदाकाठा वरील भामा नगरी नजीक आले.

हा संपूर्ण परिसर दुष्काळाच्या तडाखयात बद्ध होता. मध्यान्ह समयी आग ओकणाऱ्या सूर्याच्या उष्णतेने सृष्टी करपून, भूमी तापली होती. उन्हाचा दाह असह्य होता. चौफेर परिसरात पाण्याचा थेंबही दुर्लभ होता. घशाला कोरड पडून तहानेने आणि भुकेने व्याकूळ गोरक्षनाथ रस्ता तुडवीत आहेत. मार्गाने जात असतांना त्यांना एक शेत दृष्टीस पडले. तेथील शेतकरी, न्याहरीची वेळ झाल्याने भोजन करण्यासाठी एका झाडाच्या सावलीत बसला होता. दशमी मुखात घालणार तोच गोरक्षनाथांनी ‘अल्लख निरंजन’ अशी गर्जना केली. माणिक नामक त्या शेतकऱ्याने हातातला घास तसाच खाली ठेवून महाराजांचे दर्शन घेतले, हात जोडून विचारले, “साधू महाराज, आपण कोण आणि अशा उन्हात, आडरानात कशासाठी हिंडत आहात?”

“बळीराजा! मी एक तपस्वी आहे. तहान भुकेने व्याकूळ होऊन तुझ्याकडे अतिथी म्हणून आलो आहे. जर तुझ्याकडे अन्नपाणी असेल तर मला भिक्षा वाढ.” “मुनिराज, भोजन पात्र आपल्या समोर आहे. आपण आनंदाने भोजन करावे.” असे म्हणून माणिकने नाथांना भोजनाचे पात्र वाढून पाण्याची घागर समोर ठेवली. नाथांनी तोंडावर पाणी हबकले, गुळण्या केल्या आणि भोजन करण्यास सुरवात केली, तीव्र भुकेमुळे शेतकऱ्याच्या दशम्या अमृताहून गोड वाटल्या. पाणी पिऊन आत्मा शांत झाला. पाणी शिंपडल्याने रोप टवटवीत दिसते त्याप्रमाणे नाथांच्या चेहऱ्यावर तेज आले. गांजलेल्या गरिबास धन प्राप्तीने हर्ष व्हावा त्याप्रमाणे चार घास अन्न पोटात गेल्याने त्यांचा जीवात्मा संतुष्ट झाला. सुख तृप्तीने ते म्हणाले, “अन्नदात्या! तुझे नाव काय?

शेतकरी म्हणाला, “जोगी! मनात जी इच्छा असेल त्यासाठी प्रयत्न करावेत, प्रयत्न सफल झाले, काय इच्छिले त्याची पूर्तता झाली की व्यर्थ उठाठेवी करू नयेत. आता आपले उदरभरण झाले आहे ना? मग नसत्या चौकशा कशाला? रस्ता दिसतो आहे ना, त्या मार्गाने आता निघावे.” नाथ उत्तरले, “खरे आहे बाबा तुझे! सत्य बोललास, वेळ आल्यावर सर्वांनाच निघावे लागते, परंतु मला भोजन घालून तू माझा आत्मा तृप्त केला आहेस. तुझी जर काही मनोकामना असेल तर मला सांग! मी ती तात्काळ पूर्ण करीन.” “संन्याशी महाराज तुम्ही स्वतःच गावोगाव भिक्षा मागत फिरत आहात. तुमच्या पोटाची तुम्हाला काळजी असताना, मला तुम्ही काय देणार? एक भणंग भिकारी दुसऱ्याला काय दान देणार? पाषाण खडकातून कधी पाणी निघेल काय? अन्नासाठी दारोदार फिरणारे आपण गोसावी! माझी मनोकामना तुम्ही कसे काय पुरवणार? शेतकरी हिणवून म्हणाला, पण गोरक्षनाथ पुन्हा म्हणाले, “शेतकऱ्या! मागून तर बघ, तुझी कोणतीही इच्छा पूर्ण करीन.”

अहो साधू महाराज! आता पुरे झाले. काय आहे तुमच्याजवळ? उगाच दात्याचा आव आणत आहात. तुम्हालाच आणखी काय पाहिजे असेल तर माझ्याकडून मागून घ्या.” गोरक्षनाथ त्याला सांगतात, “मला तुझ्याकडून काही नको रे! तू अन्न दानासारखे महादान अगोदरच केले आहेस, तुझ्या दातृत्वावर मी प्रसन्न झालो म्हणून हे ऋषीराजा, माझ्याकडून काहीतरी मागून घ्यावेस अशी माझी इच्छा आहे. मी तुझी मागणी निश्चित पूर्ण करीन.”

“अहो स्वामीजी! आता गप्प बसायचे काय घ्याल ते सांगा. तुम्ही काय द्यावे आणि मी काय घावे? काय फत्तरे आहे तुमच्याकडे? गप्प गुमानपणे मार्गस्थ व्हा.” माणिकचे असले तिरसट बोलणे ऐकून नाथ मनात विचार करतात की, “हा आडदांड गडी आडवाच बोलतो आहे. सरळ बोलतच नाही. कोरड्या वावरात घाम गाळतोय आणि मलाच, काय पाहिजे ते माग म्हणतोय! असू द्या. याच्या हिताचे काहीतरी केले पाहिजे.” मग क्षणभर मनाशी विचार करून म्हणाले, “बळीराजा! तू उदार दाता दिसतोयेस, मला आणखी दान देण्याची तयारी दाखविली आहेस, तर ठाम निश्चयाने वचन द्यावे, तरच मागतो.” “अरे गोसाव्या! मला तर तू महा मुर्खच दिसतो आहेस. अरे, ज्याने तुला स्वतःच्या मुखातील घास देऊन तुझी क्षुधा तृप्त केली, तो अजून काही देण्यासाठी मागे हटेल का? अरे, कदाचित शीतल चंद्र दाहक होईल सूर्य अंधःकरात बुडेल, परंतु सच्चा दाता दान करण्यास तसुभर सुद्धा मागे हटणार नाही. पृथ्वी रसातळाला गेली तरी दात्याकडून कद्रूपणा घडणार नाही, तू माझी परीक्षा पाहतो आहेस काय? माग, तुला काय पाहिजे ते, बोल, घे मागून!” त्याचे एकेरीवर आलेले विस्तृत भाष्य ऐकून नाथांनी विचार केला, “आपल्या मनात आहे ते याच्याकडे मागितलेच पाहिजे, पाहू या तरी कशी काय पूर्तता करतो ते! मग त्याला उघडपणे म्हणाले, “हे उदार दात्या, बळीराजा!! जे जे तुझ्या चित्ताला आवडेल आणि करावेसे वाटेल, ते तू करू नकोस, हेच माझे मागणे आहे, ते मला देऊन संतुष्ट करावेस आणि दातृत्व किर्ती करावी.”

शेतकरी म्हणाला, “जा! अवश्य दिले तू मागितलेस ते. जोपर्यंत या जगात सूर्य अस्तित्वात आहे, आणि माझा देह सजीव आहे तोपर्यंत हे वचन ‘धर्म’ म्हणून पालन करीन. हे माझे वचन आहे,’’ त्याच्या दृढ निश्चयाने प्रसन्न होऊन गोरक्षनाथांनी समाधानाने पुढचा मार्ग धरला. शेतकरी उत्साहाच्या भरात वचन देऊन बसला पण पुढे वचनाची पूर्तता करताना काय झाले?... दिवसभर शेतात राबल्याने माणिकने सायंकाळी औत सोडले. दोर, दोरखंड व इतर वस्तूंचे येठण बांधले. सवयीच्या बैलांना घरच्या वाटेकडे हाकारले आणि येठणाचे ओझे डोक्यावर घेऊन गावाकडे निघण्याचा

आणि घरी जाऊन दोन घास पोटात घालण्याचा विचार करू लागला कारण भूक फार लागली होती. दुपारी त्याच्या दशम्या गोरक्षनाथांनी खाल्ल्या असल्याने तो उपाशीच होता. गोरक्षनाथांची आठवण होताच वचनाचे स्मरण झाले. मनाला जे करावेसे वाटते ते करावयाचे नाही. मनाला घरी जाऊन जेवावेसे वाटते, म्हणून घरी जायचे नाही. असा विचार करून शेतामध्ये आहे त्याच ठिकाणी डोक्यावर येठणाचा भार घेऊन उभा राहिला. येठणाचे ओझे टाकावेसे वाटते म्हणून टाकले नाही. पाय दमून बसावेसे वाटते म्हणून बसला नाही. मनातल्या विचारांनी हैराण झाला, वैतागून 'हरी नाम' जप करू लागला. उभ्या उभ्याच डोळे मिटून गाढ झोप घेऊ लागला. विचारांपासून सुटका व्हावी म्हणून हरी नाम स्मरणात तल्लीन झाला. मनाला अंग हलवावेसे वाटते म्हणून अंग सुद्धा हलवत नव्हता. देह अचल होऊन स्थिर झाला. चुकून कधी पाला पाचोळा तोंडात गेला आणि भूकेपोटी तो खावासा वाटल्यास, तो थुंकून टाकत असे. वायु भक्षण करीत स्तब्ध उभा राहिला. दिवसेंदिवस देहाची झीज होत गेली. रक्त मांस आटून सुकून गेले. उभा राहिलेल्या हाडाच्या सापळयावर फक्त त्वचा चिकटलेली, डोक्यावर येठाण ओझे, डोळे मिटलेले आणि मुखाने हरी नामस्मरण! अशा प्रकारची कष्टकारक तपश्चर्या सुरु झाली होती. गोरक्षनाथांनी माणिकचे आडवे बोलण्याच्या दुर्गुणाचा उपयोग करून त्याला तपाला लावल्याचे त्याच्या सुद्धा लक्षात आले नसावे. अर्थात योग्य गुरु मार्गदर्शतेमुळे दुर्गुणांचा उपयोग सत्कायार्थ होऊ लागल्याने अंतिमतः त्याचा फायदा होणारा होतोच, हीच गुरूंची महानता असते.

तपोनिधी गोरक्ष बद्रिकाश्रमात आले. श्रीबद्रीकेदाराचे दर्शन घेऊन चौरंगीकडे गेले. गुहामुखावरील शिळा काढून आत प्रवेश करून पाहतात तर चौरंगीच्या ठिकाणी भले मोठे वारूळ दिसत होते आणि त्यातून राम नामाचा क्षीण ध्वनी येत उमटत होता. ते पाहून गोरक्ष फार हळहळले, घाई घाईने वारूळ फोडून त्याला बाहेर काढले, त्याच्या देहावरील तुटलेल्या भागांपासून तपोबलामुळे नवीन हात आणि पाय निर्माण झाल्याचे दिसले. समाधी अवस्थेतून त्याला सावध करून गुहेबाहेर आणले. देहावर कृपादृष्टी टाकून शक्ती प्रदान केली. चौरंगीने त्यांच्या चरणांवर मस्तक ठेवून दर्शन घेतले आणि म्हणाला, "महाराज मी सनाथ झालो." मातृहृदयी गोराक्षांनी त्याला मिठीत घेऊन विचारले, "चौरंगी, कसा झाला चरितार्थ?" तो म्हणाला, "मला काही माहित नाही." त्याचे उत्तर ऐकून त्यांनी चामुंडांना वृतांत विचारला असतां, त्या म्हणाल्या, "स्वामी! आपल्या आदेशप्रमाणे आम्ही नित्यनियमाने फळे आणून देत होतो, परंतु चौरंगी ती खात नव्हता, एक टक शिळेकडे पाहत राही. तो पहा वाळलेल्या फळांचा डोंगर साठला आहे." बारा वर्षे साठलेल्या फळांचा डोंगर पाहून ते विस्मयचकित झाले. मनात म्हणाले, "ब्रम्हदिकांनाही अतर्क्य असणारी याची तपश्चर्या धन्य होय." ते फार तळमळले. मग त्याच्या माथ्यावर वरदहस्त ठेवून त्याला अनुग्रह दिला. ब्रम्हसनातन केले. त्यानंतर गोरक्षनाथ, तपोनायक ब्रम्हसनातनी चौरंगीनाथांना घेऊन श्रीबद्रीकेश्वरी शिवालयात गेले. उमापती श्रीशिवाला जागे करून चौरंगीला भेटवले. सहा महिने तेथे वास्तव्य करून त्याला सर्व विद्या आभासात; शस्त्र, अस्त्र, विद्येत प्रविण केला. तपश्चर्येच्या सांगतेसाठी सर्व देवदेवतांना आमंत्रित करून आशीर्वाद प्राप्त करून दिला. काही दिवसांनी बद्रीकेदारेश्वराला वंदन करून आणि अनुज्ञा घेऊन चौरंगीसह विदर्भातील कौंडीण्यपुर नगरीकडे निघाले.

राजा शशांगरचे कौंडीण्यपुर दिसू लागल्यानंतर गुरु गोरक्षनाथ चौरंगीला म्हणाले, "चौरंगी आपण तुझ्या मातापित्यांची भेट घेण्यापुर्वी, तुझ्या हस्तपाद खंडणाचा सूड घेऊ. राजाने अन्यायाने केलेल्या कारवाईची वेदना आजही माझ्या हृदयांत धुकधुकत आहे. ती घटना माझ्या जिव्हारी लागली आहे. तरी आता आपला विद्या प्रताप दाखविण्यासाठी तयार हो.

"अवश्य गुरुदेव!" असे म्हणून चौरंगीने वंदन केले. हातमध्ये भस्म चिमुट घेऊन वातास्त्र मंत्राचा जप केला आणि राजउपवनावर फेकले. वादळी वारा उसळून सोळाशे वनकरांसह संपूर्ण बाग आकाशांत भिरभिरू लागली. काही वेळाने अस्त्र प्रभाव काढून घेताच ते धरणीवर आले. अनेक जन मूर्च्छना येऊन त्यांची शुद्ध हरपली. जे सावध होते ते राजाकडे पळत गेले, "महाराज, इतरत्र कुठेही नव्हे, परंतु फक्त उपवनांतच भयानक वादळ उठून सर्व सेवकांसह बाग आकाशांत भ्रमण करीत होती. कुणी ही अचाट करणी केली, कोण जाणे? संपूर्ण बागेची वाताहत झाली आहे." हल्लेखोरांचा छडा लावण्यासाठी राजाने त्वरित गुप्तहेर रवाना केले. झटपट हालचाली करून हेरांनी खबर आणली, "महाराज, पाणवठ्यावर दोन कानफाटे तपस्वी बसले असून, प्रथमदर्शनीच ते विद्याप्रविण असल्याचे वाटतात." राजांनी मनाशी विचार केला, "कदाचित मच्छिंद्र आणि गोरक्ष असतील, कृष्णागराने पढविल्यांमुळे त्याची बाजू घेऊन क्रोडीत होऊन आले असतील. तरी त्यांना शरण जाण्यात शहाणपण आहे. अन्यथा संपूर्ण नगरीचा विध्वंस व्हायचा."

राजा, हत्ती, घोडे, रथ, पालख्या, सेवक इत्यादी तयारी करून नाथांच्या स्वागतासाठी सामोरा गेला, तो सर्व लवाजमा येत असल्याचे पाहून गुरु गोरक्ष म्हणाले, "तो पहा राजा, आता दाखव तुझा प्रताप." गुरूंनी आज्ञा देताच चौरंगीने पुन्हा एकदा वातास्त्र सज्ज करून त्या मिरवणुकीवर सोडताच चक्राकार वादळ उठले. हत्ती, घोडे, रथांसह राजा आणि सेवक मंडळी पाचोळ्यासारखी आकाशांत उडून गरगर फिरू लागली, किंचाळ्या, आरोळ्या आणि आकांताने आकाश भरून गेले. हाक ऐकू आली, "तपस्वी नाथ!! आम्ही शरण आलो आहोत आमच्यावर दया करून आमचे रक्षण करा." गुरुजींनी सूचना करताच चौरंगीने पर्वतास्त्रांद्वारे वादळी वाऱ्यांना अडथला उभारून शांत केले. शशांगर राजाची राजेशाही मिरवणूक पर्वतांच्या शिखरावर अडकली. नाथांनी हात उंचावून त्यांना खाली येणाचा इशारा केला. हालहाल झालेल्या लावाजम्यांसह घरंगळत राजा खाली उतरून नाथांजवळ आला, गुरु गोरक्ष शिष्याला म्हणाले, "चौरंगी, जा पित्याला नमस्कार कर!" चौरंगी धावत जाऊन पित्याच्या चरणांना मिठी मारून म्हणाला, "तातश्री, मला ओळखा, मी आपला पुत्र कृष्णागर!" राजने त्याला हृदयाशी धरला, नंतर गोराक्षांच्या चरणी माथा ठेवून वंदन केले. तेव्हा ते म्हणाले, "राजा, पाहिलास का पुत्राचा पराक्रम?" राजा म्हणाला, "योगीराज! आपणासारख्या पराक्रमी, मातृहृदयी, कुशल गुरूने घडविल्यावर शिष्य महारथी का नाही होणार?" मग चौरंगीने वज्रास्त्र टाकून पर्वत भंग करून अदृश्य केले. राजाने उभयतांना राजवाड्यात आतिथ्यासाठी नेण्याचा फार आग्रह केला तेव्हा चौरंगी म्हणाला, "तातश्री महाराज, ज्याठिकाणी भुजावंतीसारखी दुष्ट सावत्र माता आणि तिच्या आहारी गेलेला आपणांसारखा पिता आहे, त्या अपवित्र वस्तुत आम्हाला यायचे नाही. तिच्या बुद्धीने वागुनच आपण माझ्या हस्तपादांची खांडोळी केली होती." मग त्याने पंतग उडवीत असलेल्या दिवसाची संपूर्ण घटना इत्यंभूत सांगितली. पश्चाताप आणि क्रोधाने दाटून राजाने तिथेच सेवकांना आज्ञा केली, "आताच्या आता महाराणी भुजावंतीला फरफटत आणून हजर करावी." मध्येच त्यांच्या भाष्यात व्यत्यय आणत चौरंगी म्हणाला, "तातश्री, सबुरी बाळगा! आपण एवढे बोललात हेच पुष्कळ आहे, कशीही असली तरी ती महाराणी आहे. सर्वसामान्य आम प्रजे समोर राजश्रीचा असा अपमान योग्य दिसणार नाही. न्यायनिष्ठुरता दाखवायची असेल तर राजवाड्यात दंड द्यावा." पुत्राच्या शब्दाचा मान राखून राजा नाथांसह राजवाड्यात गेला. गेल्या गेल्या पायातील चढाव काढून भुजावंतीला हाणायला सुरवात केली आणि मुखाने अपशब्द वाणी वापरीत तिचा उद्धार केला. "अगं! मी बारा वर्षे तप करून संगमेश्वराकडून पुत्र मागून घेतला होता. त्या तपाचे आणि दिव्य पुत्राचे तुझ्या विकृत कामवासनेने वाटोळे

केले. तुझे अशुभ दर्शन नको आहे. चल चालती हो येथुन, तोंड काळे कर!" गोरक्षनाथांनी यथोचित राजाची समजावणी करीत त्याला शांत केले. भुजावंतीस हद्दपार केले.

शशांगर राजाने एक महिन्याच्या कालावधीत गुरु गोरक्षनाथांची उत्कृष्ट सेवा करून समाधान आणि भक्ती असा समन्वय साधत आनंद आणि तृप्ती मिळवली. त्या सेवेचे फळ म्हणून गुरु गोराक्षांनी जाते वेळी राजवंश वाढवा म्हणून वृद्ध शशांगर राजाला सुदृढ आरोग्य देऊन वीर्यवान केले. तसेच दुसरे विवाह करून राजवैभव भोगण्याचा आशीर्वाद दिला आणि शिष्य चौरंगीसह भ्रमंतीस निघून गेले.

पुढे मजल दरमजल करीत गुरु गोरक्ष आणि शिष्य चौरंगी काशी नगरीत येऊन पोहोचले. स्नानादी शुचिर्भूत देहाने गावाबाहेरील शिवालयात जाऊन शंकराचे दर्शन घेतले. पुजारीण गुरवीणीला मच्छिंद्र देहा संबंधी विचारणा केली असता तिने थरथरत भयकंपित होऊन त्यांच्या पायावर लोळण घातली. भयाने बोबडी वळली असतानाही तिने कसे तरी सांगण्याचा प्रयत्न केला. "गुरु महाराज! महाराणी रेवतीने मला वचनात गोवून चित्तभ्रष्ट केले आणि जबरदस्तीने माझ्याकडून सत्य वदवून घेतले. मात्र तिच्या व्यतिरिक्त मी अन्य कुठेही ब्र काढला नाही." नाथांच्या मनात संशयाची पाल चुकचुकली, मनात म्हणाले, "काय घडले आहे कोण जाणे? आता आपण स्वतःच गुरुदेह पाहिला पाहिजे, चंचल मनाच्या स्त्री जातीवर विश्वास ठेवणे अयोग्य आहे. बोलणे एक आणि करणे भलतेच, फार घातकी जात!" धडधडत्या अंतःकरणाने गुहा उघडून पाहतात तर गुहा रिकामी! मन आणि जाणीवा सुन्न होऊन आकांत करू लागले. "गुरुमाऊली! मला सोडून कुठे गेलांत? आता कुठे शोधू आणि काय करू? मीच तुम्हाला नाहक या प्रकरणी फसविले." असे म्हणून देह ठेवलेल्या जागी पसरले. त्या मातीला प्रेमाने गोंजारीत असतांना ते अतिशय भावनावश झाले. त्यांची ती विमनस्कता आणि विवशता पाहून, गुरुंकरिता केलेले आक्रंदन पाहून गुरवीण फार दुःखी झाली आणि संत्वान करीत म्हणाली, "महाराज धीर धरावा, मी त्वरित राणीला भेटून शवाचे काय झाले याचा तपशील मिळवून परत येते, तो पर्यंत स्वतःला सावरा."

आपल्या सहज आणि उत्स्फूर्त हसण्यामुळे काय अनर्थ झाली ह्याची तिला कल्पना आली. तरातरा चालत गुरवीण राणी रेवती समोर मुजरा करून उभी राहिली. राणीने विचारले, "शैव कामिनी, माझ्या माते! आज का येणे केलेस?" राणीस्वामिनी, बारा वर्षे संपायची वेळ आली आहे. याचे तुम्हाला खास स्मरण करून देण्यासाठी आले." गुरवीणीने एका दमात सांगितले. "अग माझ्या हितचिंतक भगिनी, मी तुझी आभारी आहे, परंतु 'त्या विषयी' चिंता करायचे कारण नाही, तू ज्या दिवशी रहस्यभेद केलास त्याच रात्री मी त्या देहाचे राई राई तुकडे करून अरण्यात पसरून टाकले होते. तेव्हाच ते वनश्वापदांनी भक्षण केले असतील, नाहीतर जीवजंतूंनी त्याची माती केली असेल. चिंतारूपी झाड मुळापासून उखडून फेकले असल्याने काळजी कशाला करवी?" असे रेवती राणीने आत्मविश्वास पूर्वक गुरवीणीला सांगितले. "फार छान केलेत, बरे झाले." असं म्हणत, चेहरा निर्विकार ठेवून गुरवीण बाहेर पडली. शिवालयात जाताना मनाशी विचार करीत होती, "अरे देवा! आता काय होईल कोण जाणे? जे सत्य आहे ते गोराक्षांना सांगितले पाहिजे. मग प्रारब्धाने काय भोग येतील ते भोगले पाहिजेत."

गुरवीणीने शिवालयात जाऊन राजवाड्यातला वृतांत कथन केला. त्यामुळे गोरक्षनाथ अतिशय संतप्त झाले, मनात विचार केला, "रेवतीचा सर्वनाश करवा काय?... नको, नको!! गुरुपत्नी ह्या नात्याने ती माझी माता आहे. तिने अपराध

केला असला तरी आपण गुरु देहाचा शोध केलाच पाहिजे. तो अविनाशी देह कुठेतरी हमखास असणार!" मग त्यांनी चौरंगीस सांगितले, "पुत्रा! तू येथे सावधान राहून माझ्या देहाचे संरक्षण कर, मी सूक्ष्म आत्मिक रूपाने त्रिभूवनांतून गुरुदेह शोधून काढण्यासाठी जात आहे, परंतु रेवती राणीने जसा गुरुदेह भंगला तसा ती माझा देह सुद्धा नष्ट करायचा प्रयत्न करील म्हणून सावध असावे." अशा सूचना करून गोराक्षांनी गुहेमध्ये आपला देह ठेवला आणि आत्मारूपाने भ्रमण करीत मच्छिंद्रनाथांचा देह शोधू लागले. जंबु द्वीप, सप्तद्वीपातील नद्या, समुद्र, घनदाट अरण्ये, पर्वत, दऱ्यां सर्वत्र दशदिशा शोधल्या. जीवजंतूंच्या देहांतसुद्धा जाऊन शोध घेतला. कुठेही देहचा तपास लागत नव्हता. मग अतळ, वितळ, सुतळ इत्यादी सप्त पाताळ, पिंड, ब्रम्हांड शोधले. शेवटी स्वर्ग लोकात गेले. सुवलोक, भुवलोक, तपोलोक, सूर्य यक्षादी सत्यलोक, कुबेर तारांगणादी असंख्य स्थळे शोधली. मेरू पठार, गण गंधर्व आदी अन्य सूरवरांच्या शरीरात शोधून वैकुंठातही शोध घेतला. शेवटी कैलासावर आले. सूक्ष्म रूपाने संचार करून पहिले असतां, चामुंडा आणि शिवगणांच्या अभूतपूर्व पहाऱ्यांत सेनानायक वीरभद्राने मच्छिंद्रनाथांच्या देहाचे तुकडे कडेकोट पहाऱ्यात ठेवल्याचे त्यांना दिसले. स्वतः वीरभद्र गर्जना करीत सैन्याला इशारा देत होता. "सावधान! जागृत राहा. बारा वर्षांचा काळ सरला असल्याने शत्रू; मच्छिंद्रनाथांचा शिष्य गोरक्ष केव्हाही आणि कोणत्याही रुपात येणे शक्य आहे. गाफील राहू नका." त्यांची जय्यत तयारी आणि संभाषण ऐकून, गोरक्षनाथांना सर्व प्रकार लक्षात आला आणि ते कैलासावरून भूमीवर आले.

गुरु मच्छिंद्रनाथांच्या अस्तित्वाचा शोध लागला, त्यामुळे गोरक्षनाथ, अर्थात सूक्ष्म अणुरेणुच्या रूपातील गोरक्ष पुन्हा शिवालयात परतले. शिवालयामधील गुहेत गोरक्षनाथांच्या देहजवळ चौरंगी सकळ शस्त्र अस्त्र विद्येचे स्मरण करून कठोरपणे पहारा देत होता. अशी जय्यत तयारी की तेथे मानव दानव तर सोडाच पण प्रत्यक्ष देवांनाही काही आगळीक करणे शक्य नव्हते. गोराक्षांनी सूक्ष्मावस्थेतून स्वतःच्या देहात प्रवेश केला आणि उठून बसले, चौरंगीला इतीवृत सांगितले. दोघेही मोकळया मैदानात आले. आपआपल्या भस्म झोळया सिद्ध करून सूर्याकडे तोंड करून उभे राहिले. गुरु गोराक्षांनी आपले सर्व सामर्थ्य एकवटून पर्वतास्त्र सोडताच आकाश पर्वतांनी भरून गेले. अत्युच्च अशा पर्वतशिखरांनी सूर्यरथाच्या मार्गात अडथला निर्माण केला. रथाची चक्रे निष्क्रिय झाली. सूर्यदेवांनी धनुष्य सज्ज करून बाणाच्या अग्रावर वज्रास्त्र विराजमान करून सोडले. शक्तिशाली वज्रास्त्राने पर्वतांचे चुर्ण करून रथमार्ग मुक्त केला पण सूर्य मनात विचार करू लागले, "कोणा प्रतापी वीराने असे शक्तिशाली पर्वतास्त्र टाकले असावे?" अंतर्ज्ञानाने निरीक्षण केले असतां, महापराक्रमी अशा गोरक्ष जतीचे हे कृत्य असल्याचे ओळखून ते धरणीवर उतरले. सावधानतां म्हणून गोराक्षांनी चंद्रास्त्र प्रवाहाने सहस्त्र चंद्राची शीतलता उभयंताच्या भोवताली निर्माण केली. सूर्यनारायणाचे दर्शन घेतले. त्यांचा भाविकपणा पाहून सूर्यदेवांनी विचारले, "पुत्रांनो! काय मनोकामना आहे? आडपडदा न ठेवता मोकळेपणाने काय ते सांगावे. गोरक्ष म्हणाले, "जगलोचना! त्रास दिल्या बद्दल क्षमा मागतो परंतु आम्हाला तुमची मदत हवी आहे. बारा वर्षांपूर्वी आम्ही एक सत्कृत्य करण्यास प्रवृत्त होऊन मच्छिंद्रनाथांचा देह या शिवालयातील गुहेत ठेवला होता. शिवगणांनी त्या देहाचे हरण करून कैलासावर कडेकोट पहाऱ्यांत ठेवला असून, परत करण्याची त्यांची इच्छा नाही, तरी आपण आमच्यावतीने वीरभद्राची भेट घेऊन समझोता करावा. कठूता निर्माण न करता तो देह आमच्या स्वाधीन करण्यास सांगावे आणि आपण सांगूनही त्यांनी हा प्रस्ताव नाकारला तर आमच्यावतीने त्यांना युद्धाचे आमंत्रण देऊन त्यांना धरतीवर घेऊन यावे. तरी हे जगत्मित्र देवा! आमच्यासाठी एवढी शिष्ठाई करून आम्हास उपकृत करावे."

अतिशय संयमितपणे आणि समंजसपणाने आपली भूमिका गोरक्षनाथांनी स्पष्ट केल्यामुळे सूर्यनारायण अतिशय प्रभावित झाले होते. ते म्हणाले, "मुलांनो तुमची भूमिका सामोपचाराची आहे, मी त्वरेने जाऊन वीरभद्राशी चर्चा करतो." शिष्टाईचा प्रस्ताव घेऊन सूर्यदेव कैलासावर वीरभद्राजवळ पोहोचले. त्यांचे स्वागत करून त्याने विचारले, "आदित्य महाराज! कसे येणे केलेत?" सूर्यदेव उत्तरले, "वीरभद्रा, मी गोरक्षाची शिष्टाई करण्यासाठी आलो आहे. तरी आता लक्षपूर्वक ऐकावे आणि सुज्ञपणाने उत्तर द्यावे. मच्छिंद्रनाथांचा देह गोराक्षाकडे सुपूर्द करणे हितकारक राहील. त्याला संतुष्ट केल्यास नाथपंथाबरोबर स्नेह भाव वाढीस लागून पुढे ते हितकर ठरणार आहे." "आपण राग मानू नये, सूर्यदेवा! आम्ही प्राण गेला तरी त्याचा देह परत करणार नाही. मच्छिंद्र हा आमचा शत्रू आहे. त्याने आम्हा सर्वांना फार दुःख दिले आहे. आमच्याबरोबर युद्ध करण्याची खुमखुमी गोरक्षाला आली असेल तर आम्ही सिद्ध आहोत. युद्धात जिंकून त्याची सुद्धा अवस्था मच्छिंद्रासारखी करून त्याला सुद्धा येथेच ठेवू." "अरे वीरभद्रा! मच्छिंद्राने तुम्हाला दुःख दिले हे काबुल करता, यांतच सर्व काही आले. तेव्हा तुमच्या शोर्याचा कितीसा प्रकाश पडला होता हे आठवावे. या गर्जना तेव्हा कुठे लुप्त झाल्या होत्या? केवळ कर्मधर्म संयोगाने त्याचा निर्जीव देह तुमच्या हातात पडला आहे म्हणून नाहक वल्गना करीत आहात, तो जर देहाने सजीव असता तर? शिवाय, गोरक्षाला तुम्ही ओळखलेले नाहीय? तो सुद्ध प्रती मच्छिंद्रच आहे. पराक्रमात गुरुपेक्षा कणभरही कमी नाही. त्या सामर्थ्यशाली तपस्वी शुरवीराचे भय बाळगा. तुला जे स्मरते, त्यावेळी मच्छिंद्र एकटा होता. आता ते एक नव्हे तर दोन आहेत. गोरक्षा सोबत त्याचा नव्हाळीचा शिष्य चौरंगीसुद्धा आहे. त्यांचा कोप झाला तर कृतांत काळालाही धडकी भरावी असा विनाशक संग्राम घडू शकतो. तेव्हा सुज्ञपणे काय तो विचार करावा." सूर्यदेवाने केलेल्या उपदेशाचा वीरभद्रावर काहीही परिणाम झाला नाही. उलट त्याने असे उत्तर दिले, "जे काही व्हायचे असेल ते होवो, परंतु मच्छिंद्र देह दिला जाणार नाही; हे त्रिवार निक्षून सांगतो. आम्ही आव्हान स्वीकारले असून, महासंग्रामासाठी तयार आहोत."

सूर्यदेवांना स्पष्टपणे जाणवले की आपली शिष्टाई असफल झाली आहे. "ठीक आहे. आपणाला योग्य वाटेल ते करा. मी माझे कर्तव्य केले आहे. जे काही होणार आहे त्याचा न्यायनिवडा सर्वशक्तिमान असा काळपुरुषच करील. तथापि माझे एक ऐकावे; तुम्ही संग्रामच करणार असाल तर तो शिवलोकात करू नका कारण त्या योग्यांच्या पराक्रमाने कैलासाचा नाश होईल आणि पशुपतीनाथ कोपून तुम्हालाच शासन करतील. त्यामुळे संग्रामसाठी तुम्ही भूमीवर उतरावे म्हणजे जी काही हानी होईल, ती शत्रू पक्षातच होईल. कैलासावर त्या संग्रामाचा परिणाम होणार नाही. रणनीतीसुद्धा हेच सांगते. या व्यतिरिक्त एक विशेष बाब लक्षात घ्यावी; मच्छिंद्र गोरक्षासह सर्व नाथपंथीयांवर शिव पार्वतीचा खास लोभ आणि प्रीती आहे. खरं तर मच्छिंद्राचा छिन्नविच्छीन्न देह अंबेनेच गोळा करून आणला होता, यावरून वास्तव तुमच्या लक्षात यायला हवे; आता त्यांच्या अपरोक्ष तुम्ही वाटेल तो धुडगूस घाला. येतो मी!" असे म्हणून सूर्यदेव निघून गेले.

सूर्यनारायणाच्या सल्ल्याप्रमाणे शिवपार्वतीच्या नकळत भूलोकात रणकंदन करण्याचा विचार वीरभद्रासह सर्वांनाच योग्य वाटला, मग व्यूहरचना करून वीरभद्राने अष्टभैरव गणांना आदेश दिला; "सर्व सेनेसह युद्धासाठी भूमीवर उतरून रणकंदन करावे. काही कुमक भासल्यास मी स्वतः येईन" वीरभद्राच्या आदेशानुसार बहात्तर कोटी चौर्यऐंशी लक्ष भैरवगण शस्त्र अस्त्रांसह भूमीवर उतरले. ते पाहून गोरक्षांनी चौरंगीला सावधानतेचा इशारा दिला आणि शीघ्र वज्रास्त्राने उभयतां भोवती वज्र कवच निर्माण केले. शिवगणांचा शस्त्र बाण वर्षाव वज्र कवचाला धडकून निष्प्रभ होऊ लागले. उभय नाथांना कोणताही अपाय होत नव्हता, शस्त्रे बोथट झाल्यावर शिवगणांनी अस्त्रविद्येचा प्रयोग सुरु केला.

अग्निअस्त्र, धुम्रास्त्र, वातास्त्र, सर्पास्त्र, काळास्त्र, वज्रास्त्र, स्पर्शास्त्र, दानवास्त्र अशी अष्टभैरवांनी आठ महाभयंकर प्रलयंकारी अस्त्रे सोडली. नाथांनी त्यांची अस्त्रे वरच्यावर उडविली. गुरु गोराक्षांनी चपळाईने जलदास्त्र, वायुअस्त्र, पर्वतास्त्र, खंगेद्रास्त्र, संजिवनीस्त्र, इंद्रास्त्र, विभक्तास्त्र, देवास्त्र, असा प्रतिहल्ला करून त्यांची अस्त्रे मोडून काढली. तेवढ्या वेळेत चौरंगीनाथांनी चढाई केली होती. त्यांनी त्यांच्यावर गुप्त मोहनास्त्र सोडले होते. त्याच्या प्रभावाने शिवगण मोहित होऊन त्यांना देहभान उरले नाही, आपण कोण? कुठून आलो, कशासाठी आलो याचा विसर पडून ते व्यर्थ भटकू लागले. याशिवाय चौरंगीने प्रलय काळीचा वातू निर्माण केल्याने ते वादळात गटांगळ्या खात राहिले.

शिवगणांची दैना पाहून वीरभद्र भयंकर क्रुद्ध झाला आणि चामुंडासह संग्रामात उतरला. धनुष्याची प्रत्यंचा ओढून आकाशव्यापी टणत्कार केला. बाणाच्या अग्रावर कामास्त्र स्थापन केले आणि बाण सोडला. पाठोपाठ ब्रम्हास्त्र आणि कार्तिकास्त्रही सुसाटपणे सोडले. प्रलयाग्नी जसा आवरता येत नाही, त्याप्रमाणे बेफाम झालेला शिवपुत्र वीरभद्र क्रोधाग्नीने धडाडून पेटला होता. ते पाहून शिवपुत्र चौरंगीने इतीअस्त्र सोडले. त्यामुळे कामास्त्र शांत झाले. ब्रम्हास्त्रावर द्शासुरी अस्त्र सोडताच दहा राक्षस प्रकट होऊन धावल्याने ब्रम्हदेव पळाले, मनात म्हणाले, “आता काही खरे नाही. पूर्वी एकट्या शंखासुराने वेद हरण करून नेले होते. आता तर एकदम दहा आले.” अशा नकारात्मक विचारांनी ब्रम्हास्त्र अदृश्य झाले. वीरभद्राच्या ब्रम्हचारी वृत्तीच्या कार्तिकास्त्रावर चौरंगीने कामिनी अस्त्र सोडून असंख्य सौंदर्यवती उभ्या केल्या. त्यामुळे कार्तीकास्त्राने माघार घेऊन तोंड लपविले. चौरंगीच्या पांचजन्य अस्त्रावर वीरभद्राने मत्स्यास्त्र सोडून निष्प्रभ केले. अशा प्रकारे जीवघेणे हल्ले प्रतिहल्ले यांची झुंबड चालली होती.

गोरक्षनाथ अतिशय संतापले होते. त्यांनी संजीवनी अस्त्र प्रयोगाने सर्व पराक्रमी दानव सजीव केले. त्रिपुर, सुंदराक्ष, मल, मृदूमान्य, म्हेसासुर, जालंधर, कालयवन, अद्य, बकासुर, हिरण्याक्ष, हिरण्यकश्यपु, मुचकुंद, बळी, वक्रदंत, रावण, इंद्रजीत, कुंभकर्ण, इत्यादी महाबलाढ्य राक्षसांची टोळी सिंहगर्जना करीत वीरभद्रावर धावून गेली. युद्धाची मजा पाहण्यासाठी जमा झालेले सुरवर राक्षसांच्या भयाने मजा पाहणे सोडून सैरावैरा पळू लागले. “एकट्या रावणाने आपणा सर्वांना बंदीखान्यात टाकले होते. तेव्हा दशरथी रामाने आपली मुक्तता केली होती. आता या राक्षसांच्या टोळीपासून कोण वांचवील? पलायनाशिवाय अन्य मार्ग नाही.” भयभीत झालेल्या देवांनी श्रीविष्णूकडे जाऊन भूमीवरील अराजक कथन केले आणि म्हणाले, “हे दयाळा चक्रपाणी, आमच्या नशिबी पुन्हा भोग आला आहे. सर्व बलिष्ट दानव सजीव झाले आहेत. तुम्हाला स्वतःला अवतार घेण्याची वेळ आली आहे.” ते ऐकून श्रीविष्णू सुद्धा विचारात पडले. त्यांनी तातडीने श्रीशिवाला पाचारून वृतांताचे निवेदन केले, म्हणाले, “महादेवा! गोराक्षांनी अतिशय अनुचित काम केले आहे. एकएका राक्षसाला मारण्यासाठी आपणाला अपार कष्ट भोगावे लागले आहेत. आपण सर्वांनी असंख्य अवतार घेतले, तेव्हा कुठे त्यांचा निःपात झाला होता. आता ते सर्वच एकदम सक्रीय झाले असल्याने भूमीसह आपणाला सुद्धा रसातळाला नेतील! त्यांना कसे आवरावे? त्या महामुर्ख वीरभद्राने आकारण गोरक्षाबरोबर युद्ध पुकारले आहे. महादेवा! वाचवा! काही उपाय योजावा.”

श्रीविष्णू, वैकुंठ सोडून गोरक्षाकडे तातडीने गेले आणि म्हणाले, “हरी नारायणा! काय आरंभले आहे हे? संपूर्ण जीवसृष्टीसह पृथ्वीचा विनाश करावयाचा आहे काय? वसुंधरेच्या रक्षणासाठी एका एका दानवाला नष्ट करण्यासाठी आम्ही अवतार घेऊन अती श्रमलो आहोत, तरी या दानवांना नष्ट करा, अन्यथा त्रैलोक्याला धोका आहे.” गोरक्ष

म्हणाले, “आदिनाथा, वैकुंठनाथा! सर्वप्रथम मला माझ्या गुरूंचा देह आणून द्या.” मग हरिहरांनी चामुंडाकरवी मच्छिंद्र देह मागवून गोराक्षांना दिला आणि म्हणाले, “पुत्रा, आता या दानवांचा सत्वर निःपात कर.”

हे दानव अस्त्र निर्मित नसून संजीवनी निर्मित आहेत. त्यांचा निःपात करण्यासाठी आपण पुन्हा अवतार घावेत. अन्यथा वीरभद्राची आशा सोडावी लागेल.” गोराक्षांच्या या भाष्यावर श्री शिव म्हणाले, “अरे, तू सर्वप्रथम या राक्षसांना नष्ट कर. येथे त्रैलोक्याच्या अस्तित्वाचा प्रश्न उभा राहिला आहे. एक मधु दैत्य माजला असता त्याने आम्हाला रानोमाळ पळविले होते. शेवटी एकादशीने त्याला मृत्युमुखी पाडला. अशा किती क्लेशदायक कथा सांगाव्यात? त्रैलोक्य रक्षणासाठी मी पुत्राचा मोह सोडला, पोटी पुत्र नव्हताच असे मी समजेन. परंतु त्रैलोक्याचे रक्षण कर. राक्षस जात नष्ट कर.”

समरभूमीवर महारथी वीरभद्र एकटाच सर्व राक्षसांशी झुंज देत होता. हरिहरांच्या आज्ञेनुसार दानवांना नष्ट करण्यासाठी गोराक्षांनी वाताकर्षण मंत्र जपून रणांगणावर भस्म उडविले. वीरभद्रासह सर्व महायोद्धे श्वासोश्वास कोंडल्यामुळे मूर्च्छित झाले. काही काळानंतर ते मृत झाले. त्यावर गोराक्षांनी अग्निस्त्र प्रयोगाने संपूर्ण समरभूमीची होळी केली. काही वेळांपूर्वी बलाढ्य रथीमहारथींच्या हल्ला प्रतिहल्ल्याने घुमणाऱ्या रणभूमीवर आता हाडांचे सांगाडे पडले आहेत. राख रांगोळी झाली आहे. हताश होऊन हरिहर ते दृश्य पाहात आहेत.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने धनुर्वात होणार नाही, किंवा झाला असल्यास तो बरा होईल.

--